श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता. तिवसा, जि. अमरावती
परिसरात पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी
विकास आराखडा.
आराखड्यातील कामांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-३२
तारीख: ०१ मार्च, २०१७

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवी-२०१२/प्र.क्र.१०/का.१४४४ दि. ३ डिसेंबर, २०१२
२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. विआकाअ/नियो/कौविआ/८७/२०१७ दि.४.२.२०१७

**प्रस्तावना :**

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता. तिवसा जि. अमरावती येथे पायाभूत नागरी सुविधा देण्यास, उक्त शासन निर्णय दिनांक ३ डिसेंबर, २०१२ नुसार आराखड्यास बाराव्या पंचवार्षिक योजनेपर्यंत,(२०१२-१७) दि. ३१ मार्च, २०१७ पर्यंत मुदतवाढ प्राप्त आहे. सदर आराखड्यातील काही कामे प्रगतीपथावर आहेत. तसेच जी कामे अद्याप सुरू झालेली नाहीत, त्या कामांकरिता किमान एक वर्षाचा कालावधी आवश्यक असल्याचे विभागीय आयुक्त, अमरावती यांनी कळविले आहे. त्यानुसार या आराखड्यातील कामे पूर्ण करण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

श्रीक्षेत्र कौंडण्यपूर, ता. तिवसा जि. अमरावती येथे पायाभूत नागरी सुविधा देण्यासाठी विकास आराखड्यास मार्च, २०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०११७१३५३०४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Prashant Sarjerao Hadambar
Date: 2017.03.01 17:15:04 +05'30'

**( प्रशांत हाडंबर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
३. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती
५. कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण विभाग, अमरावती
६. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई
७. सार्वजनिक बांधकाम विभाग/इमारती-३ मंत्रालय, मुंबई
८. जलसंपदा विभाग/मोप्र-२, मंत्रालय, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
१०. अ.मु.स.(नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.